**अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना देण्यात येणा-या भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत केंद्र शासनाने सन २०२०-२१ ते २०२५-२६ या कालावधीकरीता जारी केलेल्या सुधारीत मार्गदर्शक सूचना राज्यात लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भासशी-२०२१/प्र.क्र.१५६/शिक्षण-१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ७ जुलै, २०२३

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सा.न्या.व वि.स.वि., क्र. इबीसी-२०११/प्र.क्र.४/शिक्षण-१, दि.२.८.२०११
२) शासन शुध्दीपत्रक, सा.न्या.व वि.स.वि.,क्र.इबीसी-२०११/प्र.क्र.४/शिक्षण-१, दि.१८.९.२०१८
३) सामाजिक न्याय व अधिकारीता मंत्रालय, भारत सरकार यांचेमार्फत माहे मार्च, २०२१ मध्ये निर्गमित केलेल्या सुधारीत मार्गदर्शक सूचना.
४) शासन निर्णय, सा.न्या.व वि.स.वि., क्र. भासशी -२०२२/प्र.क्र.७४/शिक्षण-१, दि.१७.३.२०२२

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जाती प्रवर्गातील मुला-मुलींनी उच्च शिक्षण घेणे, त्यांच्या गुणवत्तेत वाढ करणे आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा आदर्श घेऊन उच्चविद्याविभुषित होणे, हा उद्देश ठेऊन अनुसूचीत जाती (नवबौध्दासह) विद्यार्थ्याकरीता भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजना सन १९५९-६० पासून राबविण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत अनुसूचीत जाती (नवबौध्दासह) प्रवर्गातील विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता दिला जातो व संबंधीत शैक्षणीक संस्थेस शिक्षण फी व परीक्षा फी अदा केली जाते. या योजनेअंतर्गत दिनांक १८.०९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये पालकांची उत्पन्न मर्यादा २.०० लाखावरून २.५० लाख करण्यात आलेली आहे.

२. केंद्र शासनाने माहे मार्च, २०२१ मध्ये निर्गमीत केलेल्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदीनुसार शैक्षणिक वर्ष २०२१-२२ पासून सुधारीत निधी वितरण कार्यपध्दती राज्यभरात अवलंबवयाची आहे. त्याचबरोबर केंद्र शासनाच्या दिनांक ०१.११.२०२१ च्या पत्रान्वये सूचित केल्याप्रमाणे सुधारीत वितरण कार्यपध्दतीचा राज्यात अवलंब न केल्यास सदरहू शिष्यवृत्ती योजनेंतर्गत राज्य शासनास अनुज्ञेय असलेले केंद्रीय अनुदानाची (केंद्र हिस्सा ६०%) अदायगी करता येणार नाही. तसेच त्या त्या आर्थिक वर्षात प्राप्त होणारे केंद्रीय अनुदान अखर्चित राहिल्यास पुढील आर्थिक वर्षात खर्च करणेसाठी पुनर्विनियोजन करता येणार नाही असे देखील सूचित करण्यांत आलेले आहे. सदर बाब विचारात घेता केंद्र शासनाच्या भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेच्या माहे मार्च, २०२१ मध्ये निर्गमित केलेल्या सन २०२०-२१ ते २०२५-२६ साठीच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांमधील निधी वितरणाशी संबंधीत मुद्दा क्र.१०.१, ११.१ व ११.२ पुरता मर्यादीत शासन निर्णय दिनांक १७.३.२०२२ रोजी विभागामार्फत निर्गमीत करण्यात आलेला असून त्यान्वये भारत सरकार पोस्ट मॅट्रीक शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत केंद्र-राज्य हिश्श्याचे सूत्र स्विकारण्यात आले आहे व

त्याचबरोबर केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांमधील शिष्यवृत्तीच्या वितरण प्रणालीस देखील मान्यता देवून ती स्विकारण्यात आलेली आहे.

३. सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, भारत सरकार यांनी अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत सन २०२०-२१ ते २०२५-२६ या कालावधीकरीता माहे मार्च, २०२१ पासून सुधारीत मार्गदर्शक सूचना जारी केलेल्या आहेत सदर मार्गदर्शक सूचना राज्यात लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमुद केल्याप्रमाणे सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, भारत सरकार यांनी अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत सन २०२०-२१ ते २०२५-२६ या कालावधीकरीता माहे मार्च, २०२१ पासून जारी केलेल्या सुधारीत मार्गदर्शक सूचना, सोबत जोडलेल्या परिशिष्टात नमुद ठळक मुद्यांसह राज्यात लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू योजनेसाठी येणारा खर्च मागणी क्र. एन-३ (०४) शिष्यवृत्ती आणि विद्यावेतने, (०४) (१६) भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती, (केंद्रपुरस्कृत १०० टक्के), (कार्यक्रम), ३४, शिष्यवृत्त्या/विद्यावेतने, (**लेखाशीर्ष- २२२५ ०४९५**) मागणी क्र.एन-३(०४) शिष्यवृत्त्या आणि विद्यावेतने, (०४) (०१) भारत सरकारच्या मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्त्या (कार्यक्रम) ३४, शिष्यवृत्त्या/विद्यावेतने लेखाशीर्ष ( **२२२५ ०३५२)** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत येऊन त्याखाली केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०७०७१७१७१६६७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SOMNATH NAMDEO BAGUL

Digitally signed by SOMNATH NAMDEO BAGUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4807C89831881EDE55B0D82CB9991539D1BD33C6F8A64931D9194D5E2CBDCF56, cn=SOMNATH NAMDEO BAGUL
Date: 2023.07.07 17:26:22 +05'30'

**(सो.ना.बागुल )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
२. अपर मुख्य सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
४. मा.मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.राज्यमंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०.उपसचिव (अर्थसंकल्प)/(विघयो), सा.न्या.व वि.स.वि., मंत्रालय, मुंबई
११.उपसचिव (शिक्षण-१), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.सर्व सहायक आयुक्त / प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, पुणे
१३.निवडनस्ती (का.शिक्षण-१)

**अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना देण्यात येणा-या भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत सन २०२०-२१ ते २०२५-२६ या वर्षांकरीता केंद्र शासनाने जारी केलेल्या सुधारीत मार्गदर्शक सूचना लागू करण्याबाबत**

**(शासन निर्णय क्रमांक : भासशी-२०२१/प्र.क्र.१५७/शिक्षण-१, दिनांक : ७ जुलै,२०२३ सोबतचे)**

**परिशिष्ट**

१. राज्य शासनाच्या महाडीबीटी पोर्टल अंतर्गत सदर योजना राबविण्यांत येत असून याबाबत राज्य शासनाच्या दि. ८ जानेवारी, २०१९ च्या शासन निर्णयानुसार महाविद्यालयांसंबंधीत मान्यता, नोंदणी (NAAC/ NBA accreditation), अभ्यासक्रमाची मान्यता, महाविद्यालयांची मान्यताप्राप्त विद्यार्थी क्षमता, अभ्यासक्रमाची मान्यता प्राप्त शुल्क रचना इत्यादी सर्व बाबींची पडताळणी व खातरजमा करुन संबंधित शैक्षणिक विभाग (उदा. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, कृषी विद्यापीठे, राज्य शिक्षण शुल्क समिती इ.) व तत्सम सक्षम प्राधिकृत यंत्रणेने महाडीबीटी प्रणालीमध्ये समावेश करावयाची जबाबदारी निश्चित करण्यांत आली आहे. सामाजिक न्याय विभागांतर्गत केवळ समाजकार्य महाविद्यालयांबाबतच उपरोक्तबाबींची पडताळणी व खातरजमा करुन प्रणाली मध्ये समावेश करावयाची जबाबदारी विभागाची राहील.

२. विद्यार्थ्यांच्या प्रत्यक्ष हजेरीबाबतची अट शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून अवलंबविण्यात येत आहे.

३. सर्व महाविद्यालयांनी त्यांचा प्रत्येक शैक्षणिक वर्षाचा वार्षीक लेखापरिक्षण अहवाल राज्य शासनास सादर करणे आवश्यक आहे. अन्यथा त्यांना देय असणा-या सर्व बाबी लेखापरिक्षण अहवाल सादर करेपर्यंत स्थगीत ठेवण्यात येतील.

४. सदर योजना ही सुधारीत नियमावलीतील अ.क्र. ४.२ मध्ये नमुद सर्व संवर्गातील शैक्षणीक संस्थांना अ.क्र. ५.९ मध्ये नमुद तसेच नियमावलीतील इतर अटी शर्थीची पुर्तता करीत असलेल्या संस्थांना लागु करण्यात येत आहे.

५. **विविध शैक्षणीक उपक्रमाव्दारे देण्यात येणा-या शिक्षण पध्दतीमध्ये वयोमर्यादेची अट ठेवण्यात आलेली नाही. सदर बाब विचारात घेता एक अभ्यासक्रम – एक शिष्यवृत्ती असे धोरण स्विकारण्यात येत आहे.**

६. सद्यस्थितीत स्वतंत्र ऑनलाईन अभ्यासक्रम राबविणेबाबत शासनाच्या कोणत्याही विभागाचे धोरण निश्चित झालेले नाही. सबब ऑनलाईन शिक्षण राबविणेबाबत संबंधीत शैक्षणिक विभागांचे धोरण निश्चित झाल्यानंतरच ऑनलाईन अभ्यासक्रमांचा समावेश करण्यांत येईल. परंतू सदर योजनेचा लाभ केवळ राज्य शासनाची मान्यता प्राप्त विद्यापीठे / केंद्रीय विद्यापीठांतर्गत दुरस्थ व सलग शिक्षण घेत असलेल्या अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना अनुज्ञेय राहील.

७. योजनेच्या लाभाचे वितरण प्राधान्याने आधारसंलग्नीकृत बँक खाते असलेल्या लाभार्थ्यांनाच देण्यांत यावे.

८. ज्या अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न २.५० लाख व त्यापेक्षा कमी आहे अशा सर्व विद्यार्थ्यांना सदर योजना अनुज्ञेय राहिल. मात्र याकरीता राज्य शासनाने खालील प्रमाणे

प्राधान्यक्रम निश्चित करुन लाभार्थ्यांची निवड करणे आवश्यक आहे.

अ) सामाजिक आर्थीक सर्वेक्षण, २०११ (SECC-२०११) मधील वंचित घटकांसाठी निर्धारीत केलेल्या एकूण ७ निकषांपैकी किमान ३ वा त्यापैकी अधीक निकषांची पुर्तता करणा-या अनुसूचित जाती प्रवर्गातील कुटुबातील विद्यार्थी.

आ) अनुसूचित जाती कुटुंबातील एक किंवा दोन्ही पालक निरक्षर असलेल्या कुटुंबातील विद्यार्थी.

इ) राज्य शासनाच्या मान्यताप्राप्त शाळा, नगरपरिषद, महानगरपालिका, स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या मान्यताप्राप्त शाळांमधून इ.१० वी उत्तीर्ण अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थी.

तसेच या प्रकारचे निवडीचे प्राधान्यक्रम अवलंबण्याकरीता जिल्हास्तरावरील सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण कार्यालयांतर्गत यंत्रणा चालू शैक्षणिक वर्षापासून नव्याने कार्यरत करण्याबाबत आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी याबाबत पुढील कार्यवाही करावी.

९. विद्यार्थ्यांना प्रवेश घेताना वा शिष्यवृत्तीसाठी अर्ज करताना येणा-या अडचणी विचारात घेता व याबाबतची कार्यवाही विहीत वेळेत पुर्ण होण्याच्या दृष्टीकोनातून जिल्हास्तरावर जिल्हा समाजकल्याण अधिकारी कार्यालय व सहायक आयुक्त कार्यालय तसेच प्रादेशिक उपायुक्त कार्यालय आणी आयुक्तालय स्तरावर विद्यार्थ्यांना विविध शिष्यवृत्ती योजनांची माहीती देणे व त्यासंबधात उद्भवणा-या अडचणींचे निराकरण करण्यासाठी संबंधित कार्यालयातील उपलब्ध कर्मचा-य़ांमधूनच एका कर्मचा-याची समुपदेशक म्हणून संबंधीत कार्यालय प्रमुखांनी नियुक्ती करावी.

१०. सदर योजनेअंतर्गत विद्यार्थ्यांना द्यावयाच्या निर्वाह भत्त्याचे सुधारीत दर पुढीलप्रमाणे आहेत :-

| गट | वार्षिक निर्वाह भत्ता (रुपये) (वसतीगृहात राहणारे विद्यार्थी) | वार्षिक निर्वाह भत्ता (रुपये) (वसतीगृहात न राहणारे विद्यार्थी) |
|---|---|---|
| गट-१ | १३,५०० | ७,००० |
| गट-२ | ९,५०० | ६,५०० |
| गट-३ | ६,००० | ३,००० |
| गट-४ | ४,००० | २,५०० |

१) दिव्यांग लाभार्थ्यांकरीता उपरोक्त निर्वाहभत्त्यामध्ये १० टक्के अधिक दर अनुज्ञेय राहील.

२) C.A./I.C.W.A./C.S./I.C.F.A. या अभ्यासक्रमांना प्रवेशित विद्यार्थ्यांना केवळ वसतिगृहात न राहणा-या विद्यार्थ्यांचेच दर लागू राहतील.

३) दूरस्थ / ऑनलाईन शिक्षण घेणा-या विद्यार्थ्यांना कोणतेही निर्वाह भत्ते लागू होणार नाहीत.

उपरोक्त दर हे शैक्षणिक वर्ष २०२१-२२ पासून लागू करण्यांत यावेत.

११. योजनेंतर्गत विद्यार्थ्यांना द्यावयाच्या निर्वाह भत्त्याचे दर हे केंद्र शासनामार्फत वेळोवेळी जाहीर / निर्धारीत केलेल्या दरानुसार अद्ययावत करण्यात येतील.

१२. अनुसूचित जाती प्रवर्गाच्या विद्यार्थ्यांने ज्या दिवशी अभ्यासक्रमास प्रवेश घेतलेला आहे त्याच दिवशी किंवा शासन जाहीर करेल त्यादिवसापर्यंत सदर योजनेकरीता ऑनलाईन अर्ज करणे आवश्यक आहे. सदर प्रक्रीयेमध्ये संबधीत महाविद्यालयाने प्रवेशीत विद्यार्थ्यांचे अर्ज त्यांनी ज्या दिवशी प्रवेश घेतलेला आहे त्याच दिवशी ऑनलाईनरित्या भरून घेणे व त्यासंबंधीत इतर कार्यवाही करणे आवश्यक आहे. अन्यथा याबाबत भविष्यात काही अडचण निर्माण झाल्यास संबंधीत महाविद्यालयास जबाबदार धरण्यात येईल.

१३. सदर सुधारीत मार्गदर्शक सूचना या सन २०२०-२१ पासून सन २०२५-२६ पर्यंत लागू राहतील. याकरिता सन २०२०-२१ या वर्षाचे केंद्रीय अनुदान निश्चित करण्याकरीता मागील तीन वर्षे (२०१७-१८ ते २०१९-२०) या कालावधीची सरासरी वार्षीक मागणी निश्चित करुन सन २०२०-२१ व त्यापुढील वर्षांकरीता निश्चित केलेल्या मागणीच्या ५ टक्के अतिरिक्त निधी प्रत्येक वर्षी केंद्र शासनाच्या प्रोजेक्ट ॲप्रेझल कमिटी (PAC) यांचेकडून वार्षीक नियोजनाला मान्यता प्राप्त झाल्यावर त्या त्या वर्षात ६०: ४० या प्रमाणात निश्चित करण्यांत येईल.

१४. सदरहू शिष्यवृत्ती योजनेंतर्गत मंजूर झालेली शिष्यवृत्तीचे वितरणाबाबत शासन निर्णय दिनांक १७ मार्च,२०२२ अन्वये स्विकारण्यात आलेले पुढील सूत्र अंतीम करण्यात येत आहे. केवळ केंद्र हिश्शाची संपूर्ण रक्कम (६० टक्के) म्हणजेच महाविद्यालयाला देय असलेले सर्व प्रकारचे नापरतावा शुल्क, (शिक्षण शुल्क, परिक्षा शुल्क, इतर शुल्क इत्यादी.) तसेच विद्यार्थ्यांना अनुज्ञेय निर्वाह भत्ता व इतर अनुज्ञेय शुल्क / भत्ते इत्यादी रक्कम थेट विद्यार्थ्याच्याच आधार संलग्नीकृत बँक खात्यामध्ये जमा होणार असून सदरहू केंद्र हिस्सा विद्यार्थ्याच्या बँक खात्यामध्ये जमा झाल्यानंतर विद्यार्थ्यास अनुज्ञेय असलेला निर्वाह भत्ता वजा जाता उर्वरीत महाविद्यालयास देय असलेली रक्कम विद्यार्थ्याने पुढील सात दिवसांच्या आत महाविद्यालयास जमा करणे अनिवार्य करण्यात येत आहे. पंरतू सदरहू शिष्यवृत्ती योजनेंतर्गत मंजूर झालेली राज्य हिश्श्याच्या रकमेबाबत राज्य शासनाची प्रचलीत कार्यपध्दती कायम ठेवण्यात येत आहे. योजनेंतर्गत वितरीत होणारा लाभ हा केवळ डायरेक्ट बेनिफीट ट्रान्सफर (डीबीटी) व्दारेच देण्यात येणार असून त्याची अन्य कोणत्याही पध्दतीने अदायगी करण्यात येणार नाही.

१५. सदर योजनेकरीता ऑनलाईन प्रणालीवर केवळ नोंदणी करण्याकरीता, शैक्षणिक वर्षामध्ये कोणत्याही मुदत कालावधीचे बंधन नाही. लाभार्थ्याला चालू शैक्षणिक वर्ष संपेपर्यंत प्रणालीवर प्राथमिक नोंदणी करता येण्यास सुविधा उपलब्ध करून देण्यात येत आहे.

१६. सदर योजनेचा लाभ हा डायरेक्ट बेनिफीट ट्रान्सफर (डीबीटी) व्दारेच देण्यात येणार असल्याने लाभार्थ्याच्या अर्जाचे नुतनीकरण करण्याकरीता आधार क्रमांक असणे व ते त्यांच्या खात्यास जोडलेले असणे आवश्यक आहे. व सदरची जबाबदारी संपुर्णत: विद्यार्थ्याची असून त्यांनी त्यांचे बॅक खाते, दुरध्वनी क्रमांक आधारकार्डाशी संलग्न करणे आवश्यक आहे.

१७. प्रतीवर्षीच्या शिष्यवृत्तीच्या अर्जाचे नुतनीकरण करण्याकरीता विद्यार्थ्याचा मागील वर्षाचा समाधानकारक प्रगती अहवाल व मागील वर्षाची किमान ७५ टक्के उपस्थिती असणे आवश्यक आहे.

१८. राज्य शासनामार्फत प्रतिवर्षी माहे एप्रिल पासून सदर योजनेचा व्यापक प्रचार व प्रसिध्दी जास्तीत जास्त खपाच्या दैनिक वृत्तपत्रातून व राज्य शासनाच्या विविध वेबसाईट / पोर्टलवरुन राज्यभरात करण्यात येईल. तसेच सदर योजनेची महाविद्यालयस्तरावरील व्यापक प्रचार व प्रसिध्दीची जबाबदारी संबंधीत महाविद्यालयांवर निर्धारीत करण्यात येत असून त्यासाठी त्यासाठी त्यांनी वेळोवेळी कार्यशाळा / शिबिरे आयोजीत करावीत.

१९. सदर योजनेच्या परिणामकारक अंमलबजावणीच्या दृष्टीने व तिचा लाभ राज्यातील शेवटच्या विद्यार्थ्यास मिळवून देण्याच्या दृष्टीने चालू वर्षापासून सदर योजनेच्या कार्यसफलतेचे मुल्यमापन करण्याकरीता आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य यांनी राज्यातील सामाजिक परिक्षण कक्षाच्या मदतीने राज्यस्तरावर / प्रादेशिक स्तरावर स्वतंत्र यंत्रणा कार्यान्वीत करावी. यामध्ये जिल्हयातील किमान १० टक्के महाविद्यालये अथवा विद्यार्थी यांचा समावेश असावा. सदर यंत्रणेने त्यांचा मासीक अहवाल शासनास सादर करावा.

२०. सदर योजनेचा लाभ घेणा-या कोणत्याही विद्यार्थ्यांची कोणतीही कागदपत्रे अथवा माहिती असत्य आढळल्यास तो लाभार्थी या योजनेच्या लाभापासून कायमस्वरुपी अपात्र ठरविण्यांत येईल. त्याचबरोबर विद्यार्थ्याने ज्या अभ्यासक्रमास प्रवेश घेतला आहे तो अभ्यासक्रम त्याने पूर्ण करणे आवश्यक आहे. जर त्याने शासनाच्या परवानगी शिवाय अभ्यासक्रम अर्धवट सोडला किंवा त्या अभ्यासक्रमाचा प्रवेश रद्द केला अथवा महाविद्यालय बदलले आणि सदरहू बाब महाविद्यालयाने शासनाच्या निदर्शनास आणून दिली तर अशा परिस्थितीत लाभार्थ्याने त्या अभ्यासक्रमास घेतलेली शिष्यवृत्ती तात्काळ खंडीत करुन त्याची वसुली शासनातर्फे करण्यांत येईल. अशा परिस्थितीत लाभार्थ्याने त्या अभ्यासक्रमास घेतलेली शिष्यवृत्ती तात्काळ शासनास परत करावयाची आहे.

२१. सदरहू सुधारीत मार्गदर्शक सूचनांमध्ये काही बदल करावयाचा असल्यास त्याबाबत केंद्र शासनाचा निर्णय अंतीम राहील.

-----------------------------------------------------------------------------------------------------------

सत्यमेव जयते
Goverment Of India

# GUIDELINES

# POST MATRIC SCHOLARSHIPS

# TO THE STUDENTS BELONGING TO

# SCHEDULED CASTES

# FOR STUDIES IN INDIA

# (2020-2021 to 2025-26)

GOVERNMENT OF INDIA
MINISTRY OF SOCIAL JUSTICE & EMPOWERMENT
Department of Social Justice & Empowerment

**(March, 2021)**

**STUDIES IN INDIA (PMS-SC)**
**(With effect from 2020-2021)**

## 1. Objective

**1.1** The objective of the scheme is to appreciably increase the Gross Enrolment Ratio of SC students in higher education with a focus on those from the poorest households, by providing financial assistance at post-matriculation or post-secondary stage to enable them to complete their education.

## 2. Scope

**2.1** These scholarships are available for studies in India only and the awardees are selected by the State Government/Union Territory to which the applicant actually belongs (i.e. the State/UT in which permanently settled or domiciled, as per the terms of domicile decided by the State).

**2.2** This is applicable to all the students who are currently beneficiaries of the scheme as well as fresh admissions.

## 3. Definitions

a) "***Group 1: Degree and Post Graduate level professional courses***" shall mean: all Professional courses in Medicine, Engineering, Technology, Planning, Architecture, Design, Fashion Technology, Agriculture, Veterinary & Allied Sciences, Management, Business Finance /Administration, Computer Science/ Applications (ii) Post Graduate Diploma courses in various branches of Management & Medicine(iii) C.A./I.C.W.A./C.S./I.C.F.A. etc. (iv) M.Phil., Ph.D. and Post-Doctoral Programmes (D.Lit., D.Sc. etc.) of Group I, Group II and Group III courses.(v) L.L.B, Integrated L.L.B, L.L.M

b) "***Group 2: Other Professional Courses leading to Degree, Diploma, Certificate***" shall mean all Professional Courses leading to Degree, M Ed. / M. Pharma., Diploma, Certificate in areas like Pharmacy (B Pharma.), Nursing(B Nursing), BFS, other para-medical branches like rehabilitation, diagnostics etc., Mass Communication, Hotel Management & Catering, Travel/Tourism/Hospitality Management, Interior Decoration, Nutrition& Dietetics, Commercial Art, Financial Services (e.g. Banking, Insurance, Taxation etc.) for which entrance qualification is minimum Sr. Secondary (10+2) and

Vocational stream, ITI courses and Polytechnic where entrance qualification is Class XII or above.

c) "***Group 3: Graduate and Post Graduate course***" shall mean: courses not covered under Group 1& Group 2 e.g. B.A / B.Sc. / B.Com etc. M.A/ M. Sc./ M.Com etc.

d) "***Group 4: All post-matriculation (Post Class X level) non-degree courses***" shall mean: All post-matriculation level non-degree courses for which entrance qualification is High School (Class X), e.g. Senior secondary certificate (class XI and XII); both general and vocational stream, ITI courses, 3 year diploma courses in Polytechnics, etc.

*Note: The list of courses in various groups is indicative and States/UTs may add courses as per laid down standard in the State/UT.*

e) "***Compulsory non-refundable fees***" shall mean**:** fee payable for enrolment/registration, tuition, games, Union, Library, Magazine, Medical Examination and such other fees compulsorily payable by the scholar to the institution or University/ Board, but does not include Refundable deposits like caution money, security deposit will, however, be excluded.

f)***"Demand"*** for a year indicates the total fund requirement for release of scholarship to all eligible students under the scheme as per the entitlements for that **particular year.**

g) **"Freeship Card"** shall mean: A card issued by the State Govt./UT Administration that entitles a student eligible for scholarship under this Scheme, to take admission in an institution, without pre-payment of tuition fee and hostel fee.

## 4. Eligibility of Educational Institutions

**4.1** Only such educational Institutions which maintain the laid down academic standards shall be covered under the scheme. The following conditions regarding the courses offered, performance of the institution, Aadhaar based attendance system are also required to be adhered to by the Institutions/Universities/Colleges in order to be eligible under the scheme:

i. Only Institutions/Colleges with the 'AISHE Code'/UDISE' Code' shall be eligible for the scholarship scheme. Based on the AISHE/UDISE-Code of the institution, all details of the institution such as - registration, affiliation and accreditation, courses being offered and number of seats approved for each course - will be pulled from the AISHE/UDISE server on to the scholarship portal automatically.

ii. All participating higher education institutions shall get NAAC/NBA accreditation before 2024, for continuation in the scheme from 2025-26 onwards.

iii. The scholarship benefits shall be linked with Aadhaar based attendance system. Therefore, the college/institution will maintain Aadhaar based attendance on a daily basis and will submit attendance details on the portal.

iv. The institutions will submit half-yearly self-audited reports to the State Governments in a prescribed format which shall be separately issued.

v. The institutions should be willing to honour the FREESHIP CARD issued by the State/District Authority through the scholarship portal and admit the student without insisting on pre-payment of the college/tuition fee or hostel fee. This would be paid by the student on release of the scholarship amount by the Government as per the provisions of this scheme. In this regard, the State Governments will coordinate with the institutions located in their respective States.

**4.2** Scholarships will be given for the study of all recognized post-matriculation or post-secondary courses (Intermediate/Senior Secondary, Diploma, long-term Vocational Training Certificate, Graduate, Post Graduate courses etc.) pursued in recognized Institutions/ Universities/ Colleges falling in any of the following 9 categories:

i. Institutions of National Importance;

ii. Central University/ State University/ Autonomous colleges recognized by UGC and Universities /Colleges recognized under section 2(f) of UGC Act;

iii. Deemed Universities;

iv. All Private Universities recognized by State/Centre;

v. Private Professional Institutions affiliated to a recognized Central/State University and covered by a Fee Fixation Committee as mandated by Supreme Court;

vi. Recognized schools/colleges for Classes XI and class XII;

vii. Diploma granting Institutions as recognized by State/UT Governments;

viii. Vocational Training Institutes affiliated to National Council of Vocational Training (NCVT);

ix. Institutions affiliated/ approved by the appropriate bodies like NMC/AICTE etc. or any regulatory body established by State/UT/Centre.

Provided that where a particular number of seats for a particular course have been recognized / authorized by the concerned regulatory authority, the scholarships shall be restricted to those numbers and courses.

## 5. Conditions of Eligibility of Students

**5.1** The scholarships are open to Nationals of India only.

**5.2** Only those candidates who belong to Scheduled Castes so specified in relation to the State/Union Territory to which the applicant actually belongs /domiciled as determined by the State/UT and who have passed the Matriculation or Higher Secondary or any higher examination of a recognized University or Board of Secondary Education will be eligible.

**5.3** Scholarships will be paid to the students whose parents'/guardians' income from all sources does not exceed Rs. 2,50,000/- (Rupees Two lakh Fifty thousand only) during the last Financial Year. Income certificate is required to be taken once only i.e. at the time of admission only to courses which are continuing for more than one year. The income certificate shall be issued by the Authority as decided by the State Government.

**5.4** The ceiling on age limit for admission as regular student in different classes should be decided by concerned Institutions.

**5.5** Candidates who, after passing one stage of education are studying in the same stage of education in a different subject e.g. Intermediate Science after Intermediate Arts or B.Com after B.A. or M.A in one subject after M.A in other subjects will not be eligible.

**5.6** Students, who pursue their studies through correspondence/online courses, are also eligible. The term correspondence includes distant and continuous education for courses in Central/ State Universities only. Non-refundable fees shall be paid and no academic allowance will be paid.

**5.7** All the children of any parent/guardian will be entitled to receive benefits of the scheme.

**5.8** A scholarship holder under this scheme will not hold any other scholarship/stipend. If awarded any other scholarship/stipend, the student can exercise his/her option for either of the two scholarships/stipends, whichever is more beneficial to him/her, and should inform the awarding authority through the Head of the Institution about the option made. No scholarship will be paid to the students under this scheme from the date he/she accepts another scholarship/stipend. The student can however, accept free lodging or a grant or ad-hoc monetary help from the State Government or any other source for the purchase of

books, equipment or for meeting the expenses on board and lodging in addition to the scholarship amount paid under this scheme.

**5.9** All seats filled through arbitrary and non-transparent processes (including management quota, NRI quota, spot admissions etc.) without following the merit criteria as decided by the State Government are not eligible for these scholarships. The fees claimed against management quota seats, spot admission seat in any Institution /University will not be reimbursed. In case of any contradiction on the classification of seats or non-clarity on the classification of seats in the State/UT, the following criteria may be followed:

i) If there is no arbitrariness/ discretion in the admission process and the fee for the course is fixed by the Fee Fixation/Fee Rationalization committee set up by the competent authority, the said seats may not be considered as the Management Quota Seats. However, the State Governments may satisfy themselves of the following before release of scholarships:

i. That the applicants claiming the scholarship have been admitted through a transparent process which involved calling of applications through advertisements, preparation of ranks, selection of candidates on merit list, and publication of selection list and others as deemed fit by the State Government;

ii. That the fees for courses are duly approved by the Fee Fixation/Fee Rationalization Committee set up by the competent authority.

**5.10** Students shall be encouraged to have Aadhaar linked Bank accounts to facilitate payments through the Aadhaar Payment Bridge.

## 6. Role of the State Governments

6.1 Although many SC students have availed benefits under this scheme and have occupied high positions in the society, still the Gross Enrolment Ratio (GER) of SCs in higher education (23.0%) lags behind the national average (27.0%). It is the endeavour of the Government to raise the GER of SCs in higher education from 23.0 % to the national average in the next five years. Similarly, the GER in Senior Secondary education of SCs has to increase from the current 56% to the national average in the next five years. Towards this end, special focus of the implementing agencies is required to achieve the goal.

